महाराष्ट्र वानिकी प्रकल्पांखालील उत्पादन वानिकी कार्यक्रमांतर्गत अस्थाई पदे सन २०२०-२१ मध्ये चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:-एफडीएम -२०२०/प्र.क्र.१८/फ-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३० मार्च, २०२०

वाचावे :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफडीएम-२०१९/प्र.क्र. ३०/फ-२, दि. १६.१०.२०१९.
२) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. १२.०२.२०२०.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.४६/१९-२०/१७३०, दि.१८.०२.२०२०

शासन निर्णय :-

महाराष्ट्र वानिकी प्रकल्पाखालील उत्पादन वानिकी कार्यक्रमांच्या अंतर्गत खालील १३ अस्थायी पदांना सन २०१९-२० मध्ये दि.०१.१०.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र. १ येथील दि. १६.१०.२०१९ च्या शासन निर्णयान्वये शासनाची मंजुरी देण्यात आली होती. सदर मुदत दि.२९.०२.२०२० रोजी संपुष्टात आली आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ येथिल दि.१८.०२.२०२० रोजीच्या पत्रान्वये सन २०२०-२१ मध्ये सदर १३ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. तसेच महसूल व वन विभागाने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या अस्थायी पदांचा समावेश आहे.

महाराष्ट्र वानिकी प्रकल्पाखालील उत्पादन वानिकी कार्यक्रमांच्या अंतर्गत खालील १३ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.१२.०२.२०२० च्या अधिन राहून दि. ०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक वनसंरक्षक | ६ |
| २ | वनक्षेत्र सर्वेक्षक | ६ |
| ३ | सहाय्यक वन सांख्यिकी | १ |
| | एकूण | १३ |

२. सदरहू पदांच्या वेतनावरील खर्च -प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनेतर) ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण, विकास व पुनर्निर्मिती (०२) (०२) कृत्रिम पुनर्निमिती (२४०६ ०१२२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२०-२१ यावर्षी त्याखालील मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३११४०३१५४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d36623 3b80405514f23a879132aeec, cn=Atul Ashok Kode
Date: 2020.03.31 14:07:47 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रतिलिपी :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).
४) मुख्य वनसंरक्षक, मध्यवर्ती मुल्यांकन घटक, नागपूर.
५) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
७) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ/नागपूर/चंद्रपूर/पुणे/नाशिक/औरंगाबाद
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.